**मंत्रालय इमारतीसाठी राष्ट्रध्वज खरेदी करण्याच्या वित्तीय मर्यादेत वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफएलजी - २०१६/प्र.क्र.२३३/प्रशासन- ४**
मंत्रालय, मुंबई -४०००३२.
दिनांक : १९ डिसेंबर, २०१८

**प्रस्तावना** :-

मंत्रालय इमारतीवर राष्ट्रध्वजाचे दररोज अवरोहण केले जाते. सदर राष्ट्रध्वजांची खरेदी सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात येते. सदर राष्ट्रध्वज खरेदीच्या खर्चाची वार्षिक मर्यादा सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्रमांक एफएलजी - २०१२/ प्र.क्र.३२८/प्रशासन ४, दिनांक १९/०१/२०१२ नुसार रु.१०,००,०००/- (दहा लाख फक्त) इतकी होती. ऊन, वारा, पावसाळ्यातील अतिवृष्टी व वेगवान वारे, इत्यादी कारणांमुळे राष्ट्रध्वज निरुपयोगी होतात, अशा वेळेस राष्ट्रध्वज तातडीने बदलणे गरजेचे असते. राष्ट्रध्वज तयार करण्याकरिता वापरण्यात येणाऱ्या खादी कापडाचे दर, इतर रसायने, रंग, मजूरी खर्च इत्यादींच्या दरामध्ये वाढ झाल्यामुळे राष्ट्रध्वज पुरवठादारांनी राष्ट्रध्वजांचे दर वेळोवेळी वाढविले आहेत. याकरीता राष्ट्रध्वज खरेदी करण्याकरिता वार्षिक वित्तीय मर्यादेत वाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय** :-

मंत्रालय इमारतीवरील राष्ट्रध्वजाच्या वार्षिक खरेदीची वित्तीय मर्यादा रु.१०.०० लाखांवरुन रु.२५.०० लाख (रुपये पंचवीस लाख फक्त) करण्यात येत आहे. प्रशासकीय विभाग म्हणून सार्वजनिक बांधकाम विभागास प्रदान करण्यास वित्तीय अधिकार प्रदान समितीने दिलेल्या मंजूरीनुसार सदर वाढ करण्यात येत आहे. सदर खर्चाची तरतूद प्रत्येक वर्षाच्या अर्थसंकल्पामध्ये करणे आवश्यक राहील.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक ४८२/२०१८/विनियम, दिनांक ११/०९/२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८१२१९१२२००४७७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

N B Khedkar

Digitally signed by N B Khedkar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=99977b58556463dbb2db463cec9482d13f7661ed3b2a95e83e386485fff4c21e, cn=N B Khedkar
Date: 2018.12.19 12:28:26 +05'30'

**( नि. भा. खेडकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. सचिव (रस्ते) / (बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
४. महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
७. आंतर वित्तीय सल्लागार व सह सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
८. अवर सचिव (अर्थ), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. कार्यासन अधिकारी (लेखापरीक्षा), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. वित्त विभाग (व्यय-११) / (विनियम),मंत्रालय, मुंबई,
१२. सामान्य प्रशासन विभाग (राजशिष्टाचार), मंत्रालय, मुंबई,
१३. निवडनस्ती, कार्यासन (प्रशासन-४), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.